ट्रामा केअर युनिट, नांदुरा जि. बुलढाणा येथील बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१७/प्र.क्र.३३ /आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २० मार्च, २०१७.

**<u>शासन निर्णय :</u>**

उपरोक्त विषयांकीत शाईच्या स्वाक्षरीने दिनांक १५.०३.२०१७ रोजी निर्गमित करण्यात आलेला शासन निर्णय सोबत जोडलेला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२०१२३०१४९७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.21 11:00:09 +05'30'

**( रो.दि. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.

६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णलय, बुलढाणा

७. अधिक्षक, जिल्हा रुग्णालय, बुलढाणा

८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलढाणा.

९. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, मलकापूर, जि. बुलढाणा.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. बुलढाणा.

११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.

१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. निवडनस्ती (आरोग्य-३).

ट्रामा केअर युनिट, नांदुरा जि. बुलढाणा येथील बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१७/प्र.क्र.३३ /आरोग्य ३**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १५ मार्च, २०१७.

**वाचा :**

१) आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : संआसे/ कक्ष-३/टे-६/नांदुरा ट्रामाबांधकाम/१२५०-५१/१६, दिनांक ०८.०२.२०१७.

**प्रस्तावना :**

ट्रामा केअर युनिट, नांदुरा जि. बुलढाणा येथील बांधकामाच्या रुपये २,६९,५२,४५०/- एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

२. ट्रामा केअर युनिट, नांदुरा जि. बुलढाणा येथील बांधकामाचे अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर कामाच्या अंदाजपत्रकात कुंपन भिंत, अंतर्गत रस्ते, विद्युतिकरण, पाणीपुरवठा व मलनि:सारण, भुविकास, नेर वॉटरहोर्वेस्टिंग, सोलर एनर्जी सिस्टीम, पार्कीग व्यवस्था, सायकल स्टँड, अग्निप्रतिबंधक उपाययोजना, बोअरवेल व पंपवेल, वातुनुकुलीत यंत्रणा इत्यादीसह आकस्मिक खर्च, चाचणी शुल्क व विमा इत्यादीकरीता तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदी योग्य करण्यात येवून रुपये २९६.८४ लक्ष एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
२) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

३) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्यात्या- भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.

४) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्यात्या- आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

५) सदरचे काम नवीन नमुना नकाशांप्रमाणे करावयाचे झाल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञामार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सदर नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

६) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य/ उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञाकडून या कामांच्या नकाशे व वास्तुमांडणी आराखड्यांना वेगळ्या मंजूरीची आवश्यकता नाही.

७) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. ट्रामा केअर युनिट, नांदुरा जि. बुलढाणा येथील बांधकामावरील खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च, ०२- ग्रामीण आरोग्य सेवा, ०४- सार्वजनिक आरोग्य, १०४- सामुहिक आरोग्य केंद्र, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ०३९१), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात यावा.

४. ट्रामा केअर युनिट, नांदुरा जि. बुलढाणा येथील बांधकामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

५. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( रो.दि. कदम पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णलय, बुलढाणा
७. अधिक्षक, जिल्हा रुग्णालय, बुलढाणा
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलढाणा.
९. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, मलकापूर, जि. बुलढाणा.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. बुलढाणा.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-३).